**मागणी क्र. सी-०७ २४०६- वनीकरण व वन्यजीवन, उप संचालक, सामाजिक वनीकरण विभाग (२४०६ ००९६) (अनिवार्य) लेखाशिर्षांतर्गत ११- देशांतर्गत प्रवास खर्च या उद्दीष्टाखाली उपलब्ध असणारा निधी ३-अतिकालिक भत्ता या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : एफडीएम-२०२४/प्र.क्र.२५/फ-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३१ मार्च, २०२४.

**वाचा** : १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.०१(भाग-३)/ ६२०/२०२३-२४, दि.१३.०३.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, ०५.०२.२०२४ व ०४.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२४ करीता मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. सी-०७-२४०६- वनीकरण व वन्यजीवन, राज्यस्तरीय अनिवार्य योजना (२४०६ ००४२), (२४०६ ००७८), (२४०६ ००९६), (२४०६ ०१३१), (२४०६ ०४५२), (२४०६ ०४७२), (२४०६ ०७६६), (२४०६ ८५१५) व (२४०६ ८५२४) अंतर्गत ०३- अतिकालिक भत्ता या उद्दीष्टांतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी अपुरा पडत आहे.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्या वाचा क्र.२ येथील पत्रान्वये मागणी क्र. सी-०७ २४०६- वनीकरण व वन्यजीव, (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (अनिवार्य) (२४०६ ००९६) लेखाशिर्षातर्गत ११- देशांतर्गत प्रवास खर्च या उद्दीष्टाखाली उपलब्ध असणारा रु.९१.८४ लक्ष इतका निधी उपरोक्त नमूद लेखाशिर्षांतर्गत ०३-अतिकालिक भत्ता या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण व पुनर्विनियोज करून मिळणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

त्या अनुषंगाने २४०६ ००९६ लेखाशिर्षांअतर्गत ११- देशांतर्गत प्रवास खर्च या अंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीपैकी रु.९१.८४ लक्ष इतका निधी ०३- अतिकालिक भत्ता या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण व पुनर्विनियोजन करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचा प्रस्ताव तसेच वित्त विभागाने वाचा क्र.१ येथील परिपत्रकांन्वये दिलेल्या सूचना विचारात घेता, सन २०२३-२४ या वर्षाकरीता मागणी क्र. सी-०७ २४०६- वनीकरण व वन्यजीव, (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (अनिवार्य) (२४०६ ००९६) लेखाशिर्षांतर्गत ११- देशांतर्गत प्रवास खर्च या उद्दीष्टाखाली उपलब्ध असलेल्या निधीपैकी रु.९१.८४ लक्ष इतका निधी ०३- अतिकालिक भत्ता या उद्दीष्टाखाली पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे पुनर्वितरण व पुनर्विनियोजन करण्यास व बीम्स् (BEAMS) प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

(रक्कम लाखात)

| अ. क्र. | मुख्यलेखाशिर्ष | सविस्तर शीर्ष | अर्थसंकल्पित तरतूद | सुधारित अंदाज २०२३-२४ | प्रस्तावित घट/वाढ |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | | ८ |
| १. | प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ७००.०० | ४००.० | (- ९१.८४) |
| २. | प्रादेशिक वनसंरक्षक (२४०६ ००४२) | ०३-अतिकालिक भत्ता | २४०.०० | २.४० | (+ २.१४) |
| ३. | रस्ते आणि पुलांची दुरुस्ती (२४०६ ००७८) | ०३-अतिकालिक भत्ता | १६०.०० | १.६० | (+ १.००) |
| ४. | प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) | ०३-अतिकालिक भत्ता | ६४०.०० | ६.४० | (+ ३२.०९) |
| ५. | अग्नीपासून वनांचे संरक्षण (२४०६ ०१३१) | ०३-अतिकालिक भत्ता | ४८०.०० | ४.८० | (+ ७.६५) |
| ६. | शासकिय भिकरणाकडून समुपयोजन (तेंदू) (२४०६ ०४५२) | ०३-अतिकालिक भत्ता | ४४०.०० | ४.४० | (+ ४.२६) |
| ७. | शासकिय अभिकरणाकडून समुपयोजन (इमारती लाकुड) (२४०६ ०४७२) | ०३-अतिकालिक भत्ता | ३६००.०० | ३६.०० | (+ १८.७२) |
| ८. | निसर्ग संवर्धन व वन्यपशू संरक्षण (२४०६ ०७६६) | ०३-अतिकालिक भत्ता | ६००.०० | ६.०० | (+ १६.२७) |
| ९. | उप महासंचालक, सामाजिक वनीकरण आणि मुख्य वनसंरक्षक (२४०६ ८५१५) | ०३-अतिकालिक भत्ता | ९०.०० | ०.९० | (+ १.३८) |
| १०. | उप महासंचालक, सामाजिक वनीकरण (२४०६ ८५२४) | ०३-अतिकालिक भत्ता | १३००.०० | १३.०० | (+ ८.३३) |
| | **एकूण** | **११- देशांतर्गत प्रवास खर्च** | | | **(- ९१.८४)** |
| | | **३-अतिकालिक भत्ता** | | | **(+ ९१.८४)** |

२. पुनर्वितरणाने व पुनर्नियोजनाने उपलब्ध करुन दिलेला निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे. त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची खातरजमा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन आदेश, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१६८/२०२४ व्यय-१०, दि.२८.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र.३, परिच्छेद १६६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३११६५६०१०६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2024.03.31 17:05:21 +05'30'

**( भगवान सावंत )**
**उप सचिव(वने), महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा.नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
५) सर्व कोषागार अधिकारी सदर प्रकरणी वित्त विभागाने उपरोक्त अनौपचारिक संदर्भानुसार मान्यता दिल्यानुसार कार्यवाही करावी.
६) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
७) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
८) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१०) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.